संगणक सांकेतांक २०११०२२३१८०९४०८००१

**मा.न्यायालयात तपासी अधिकारी यांच्याकडून सादर करण्यात येणाऱ्या केस डायरी संदर्भात फौजदारी दंड प्रक्रिया संहिता १९७३ चे कलम १७२ (१-ब) मध्ये करण्यात आलेल्या सुधारणाबाबत**

**महाराष्ट्र शासन**

परिपत्रक क्र.संकिर्ण-२०११/प्र.क्र.१७९/पोल - ११,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २०११.

परिपत्रक

गुन्हयाच्या तपासादरम्यान "डायरी" ठेवण्याची तरतूद फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम १७२ मध्ये करण्यात आलेली आहे. तसेच मुंबई पोलीस मॅन्युअल (पार्ट-३) मधील नियम २२५ (चॅप्टर ६) मध्ये याबाबत तपशीलवार सुचना दिलेल्या आहेत. सद्यस्थितीत डायरी सुट्या पृष्ठांच्या स्वरुपात असते. तसेच सदर पृष्ठांवर काहीवेळा पृष्ठांकन करण्यात येत नाही.

२. फौजदारी प्रक्रिया संहिता १९७३ चे कलम १७२ (१-ब) मध्ये सन २००८ मध्ये सुधारणा (अधिनियम ५ / २००९) करताना केंद्र शासनाने कलम १७२ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा केली आहे.

"(1 A) The statements of witnesses recorded during the course of investigation under section 161 shall be inserted in the case diary.

(1 B) The diary reffered to in sub-section (1) shall be a volume and duly paginated."

उपरोक्त सुधारणा दि.३१/१२/२००९ पासून अंमलात आलेली आहे त्या सुधारणानुसार केस डायरी ही पुस्तक स्वरुपात किंवा बांधणी केलेल्या पृष्ठांच्या स्वरुपात असावी व केस डायरीच्या पृष्ठांना पृष्ठांकन केलेले असावे. तथापि, उपरोक्त सुधारणाप्रमाणे डायरी ठेवण्यात येत नाही असे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे.

३. सदर सर्व तपासी अधिकारी तसेच पर्यवेक्षीय पोलीस अधिकाऱ्यांनी सुधारीत तरतूदीचे पालन करण्याची कटाक्षाने दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नं. म. शिंदे )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, (अपील व सुरक्षा), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे,
अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
परिक्षेत्रीय सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्र),
सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्ग सहित),
सर्व पोलीस अधीक्षक (लोहमार्ग सहित),
संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सरकारी वकील व सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
सर्व सह सचिव / उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती / (पोल - ११).

----------